अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन अधिकारी/सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबत

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-१२१९/प्र.क्र.१६/का.१४२७**
मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १२ फेब्रुवारी, २०१९

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व कलम ५ तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २८/०४/२०१५ च्या अधिसूचनेतील नियम १२ खालील तरतुदीनुसार अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन अधिकारी / सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित) संवर्गातील खाली नमूद अधिकाऱ्यांची सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने बदली करण्यात येत असून; संबंधित अधिकाऱ्यांची पदस्थापना स्तंभ क्र. ३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नांव, पदनाम व सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|
| (१) | (२) | (३) |
| १ | श्री.द.रा.आव्हाड,<br>सहायक जिल्हा नियोजन अधिकारी,<br>जिल्हा नियोजन समिती,<br>जिल्हाधिकारी कार्यालय,<br>जिल्हा हिंगोली | सहायक जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती, जिल्हा नाशिक |
| २ | श्री.ई.न.निवांत,<br>सहायक जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती,<br>जिल्हा गडचिरोली | प्रशासकीय-नि-संशोधन अधिकारी,<br>विदर्भ वैधानिक विकास मंडळ,<br>जिल्हा नागपूर |
| ३ | श्री.रा.गं.ढोकणे,<br>नियोजन अधिकारी,<br>एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी,<br>जिल्हा अमरावती | जिल्हा सांख्यिकी अधिकारी,<br>जिल्हा सांख्यिकी कार्यालय,<br>जिल्हा बुलढाणा |

२. संबंधित कार्यालयप्रमुखांनी संबंधित अधिकाऱ्यांच्या पदाचा कार्यभार अन्य अधिकाऱ्याकडे सोपवून उपरोल्लिखित अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे तसेच कार्यमुक्तीनंतर संबंधित अधिकाऱ्यांनी बदली केलेल्या पदावर तात्काळ रुजू व्हावे व त्या पदाचा कार्यभार स्विकारावा.

३. बदली झालेले अधिकारी बदलीच्या कार्यालयात रुजू झाल्यानंतर त्यांनी तात्काळ संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्याशी संपर्क साधून ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची कार्यवाही सात दिवसांच्या आत करावी. अद्ययावत केलेले ई-प्रोफाईल संबंधित कार्यालयाने संबंधित अधिकाऱ्याच्या त्या महिन्याच्या वेतन देयकासोबत कोषागार कार्यालयास सादर केल्याशिवाय त्यांचे वेतन देयक कोषागार कार्यालयाने पारित करु नये. अद्ययावत ई-प्रोफाईलच्या प्रती "संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई" व शासनास पाठविण्यात याव्यात. ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची जबाबदारी संबंधित कार्यालयप्रमुखांची राहील.

४. संबंधित कार्यालयप्रमुखांनी बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास कार्यमुक्त केल्याबाबतच्या व रुजू करुन घेतल्याच्या आदेशाची प्रत या विभागास अग्रेषित करावी.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२१२१०५२४१६७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vanita Narayan Jadhav

Digitally signed by Vanita Narayan Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f0e1884948542877a779b797fc357f1c34d84fe1aa3f9bdc30c060e0431223f, serialNumber=ad56893b2ddc6497ed23d778715c30a6ea094f5d1e0fb38a44ac5b9179a65d83, cn=Vanita Narayan Jadhav
Date: 2019.02.12 11:53:53 +05'30'

**( वनिता ना. जाधव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अधिकारी
(मार्फत:- अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई)

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
२. मा.मुख्यमंत्री/ मा.मंत्री (नियोजन)/ मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर/ औरंगाबाद/ अमरावती/ नाशिक
४. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक
५. सदस्य सचिव, विदर्भ वैधानिक विकास मंडळ, नागपूर
६. जिल्हाधिकारी, हिंगोली/ नाशिक / गडचिरोली / नागपूर/ अमरावती/बुलढाणा
७. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
८. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर/ औरंगाबाद/ अमरावती/ नाशिक
९. सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती

१०. सह सचिव/ उप सचिव (आस्थापना), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी, जिल्हा अमरावती
१२. उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१३. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, हिंगोली/ नाशिक/ गडचिरोली/ नागपूर/ अमरावती/ बुलढाणा
१४. जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), हिंगोली/ नाशिक/ गडचिरोली/ नागपूर/ अमरावती/ बुलढाणा
१५. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, हिंगोली/ नाशिक/ गडचिरोली/ नागपूर/ अमरावती/ बुलढाणा
१३. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१४. निवड नस्ती